**राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई या कार्यालयाच्या अधीनस्त वाहनचालक (गट-क) चे पद बाह्ययंत्रणेकडून उपलब्ध करुन घेणेबाबतच्या खर्चास प्रशासकीय मान्यता व मंजूरी देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**

**शासन निर्णय क्र.ग्रासंजा २०२०/प्र.क्र.१७ /ग्रासं-४**

मंत्रालय (विस्तार), मुंबई ४०० ०३२.

दिनांक: १६ डिसेंबर, २०२१.

**संदर्भ**: (१) वित्त विभाग शा.परिपत्रक क्र.पदानि २०१०/प्र.क्र.८४/२०१०/विसु-१, दि.२७.०९.२०१०.

(२) वित्त विभाग शा.परिपत्रक क्र.पदानि २०१३/प्र.क्र.११/२०१३/विसु-१, दि.०२.०२.२०१३

(३) वित्त विभाग शा.परिपत्रक क्र.पदानि २०१३/प्र.क्र.११२/१३/विसु-१, दि.०२.१२.२०१३.

(४) उद्योग, उर्जा व कामगार विभाग शा.नि.क्र.भाखंस २०१४/प्र.क्र.८२ भाग III/ उद्योग-४, दि.०१.१२.२०१६

(५) अ.ना.पु.ग्रा.सं.विभाग शासनपत्र क्र.ग्रासंजा १९१३ /प्र.क्र.२०८/ग्रा.सं-४, दि.२०.०२.२०१४.

(६) वित्त विभाग शा.परिपत्रक क्र.संकीर्ण २०१९/प्र.क.२२ /कोषा प्रशा-४, दि.२९.०१.२०२०.

(७) राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई यांचे पत्र क्र.जा.क्र.राआ/महा/आस्था /बाह्यस्रोत/ वाहनचालक/ २१/३८४३, दि.३०.११.२०२१

**प्रस्तावना:**

ग्राहक संरक्षण अधिनियम, २०१९ अंतर्गत गठित राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई यांचे अधिनस्त"वाहनचालक " हे गट-क चे एक पद मंजूर आहे. सदरचे पद बाह्यस्रोत यंत्रणेव्दारा भरणेसाठी राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोगाने www.grahak.maharashtra.gov.in या संकेतस्थळावरुनच्या दरपत्रक सूचनेनुसार संबंधितांकडून दरपत्रक मागविले होते.

२. सदर दरपत्रक सूचनेस अनुसरुन विहीत मुदतीत प्राप्त दरपत्रकापैकी क्रिष्णा मोटर्स, मॅनपावर सर्व्हिसेस, जोगेश्वरी (पूर्व), मुंबई यांचे दरपत्रक कमी दराचे व आयोगाच्या कार्यालयाच्या अटी व शर्ती पूर्ण करीत असल्याचे छाननी अंती दिसून आल्याने क्रिष्णा मोटर्स, मॅनपावर सर्व्हिसेस, जोगेश्वरी पूर्व, मुंबई ६० यांचेकडून वाहनचालक सेवा दि.०१.१२.२०२१ ते ३१.१०.२०२२ कालावधीकरिता उपलब्ध करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती राज्य आयोगाच्या संदर्भाधीन पत्रान्वये करण्यात आली आहे. त्यास अनुसरुन वाहनचालक बाह्ययंत्रणेकडून उपलब्ध करुन घेणेबाबतच्या खर्चास प्रशाकीय मान्यता व मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई यांचे अधिनस्त “वाहनचालक” हे गट-क चे एक पद मंजूर असून सदरचे पद बाह्यस्त्रोत यंत्रणेव्दारे क्रिष्णा मोटर्स, मॅनपावर सर्व्हिसेस, जोगेश्वरी (पूर्व) मुंबई-६० या संस्थेकडून दि.०१.१२.२०२१ ते दि. ३१.१०.२०२२ (११ महिने) या कालावधीसाठी खालील दराने उपलब्ध करण्यास प्रशासकिय मान्यता देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | बाब | दर (रुपये) |
|---|---|---|
| १. | वाहनचालक यांच्या वेतनाचा मासिक ठोक<br>(वाहनचालक यांच्या दिवसाचा कालावधी ९ तास) | रु. रु.१६,५००/ |
| २. | GST (रु. १६,५००/- अतिरिक्त) | १८ % |
| ३. | दररोजच्या ९ तासापेक्षा जास्त काम झाल्यास शासनाच्या प्रचलित दराने अतिकालिक भत्ता | रु.४०/- |
| ४. | मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाच्या हद्दी बाहेर जावे लागल्यास भत्ता | रु. ३००/- |
| ५. | वाहनचालकास रात्री १०.०० वा. नंतर थांबावे लागल्यास, जेवणभत्त्याचा दर | रु. १५०/- |
| ६. | वाहनचालकास रात्री ११.०० वा. नंतर थांबावे लागल्यास, त्यांच्या घरी जाण्याचा प्रवास भत्त्याचा दर | रु. २००/- |

२. वरीलप्रमाणे संबंधित संस्थेकडून उपलब्ध करुन घेण्यात येणाऱ्या मनुष्यबळाच्या वेतनापोटी येणाऱ्या खर्चास संदर्भाधीन वित्त विभागाच्या परिपत्रकाव्दारे देण्यात आलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार, सदरचे पद नियमित पध्दतीने भरल्यामुळे होणाऱ्या खर्चाच्या तुलनेत बाह्ययंत्रणेव्दारे सेवा घेताना होणाऱ्या खर्चात १० टक्के ते २५ टक्के बचत होईल या अटीच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

३. सदरचा शासन निर्णय हा वित्त विभाग क्र.विअप्र २०१३/ प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७.०४.२०१५ मधील वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-चार खर्चाच्या संकीर्ण बाबीमधील अ.क्र.११ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारातील अटींच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर कर्मचाऱ्याच्या वेतनावर होणारा खर्च मागणी क्र.एम-२, मुख्य लेखाशिर्ष २४०८, अन्न साठवण व वखार साठवण, (०४) (००) ग्राहक संरक्षण अधिनियम, १९८६ अंतर्गत राज्य परिषद, राज्य आयोग आणि जिल्हा मंचाची स्थापना (०४) (०१) मुंबई शहर (२४०८ ०२५१), १०, कंत्राटी सेवा या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सदर खर्च वित्तीय वर्ष २०२१-२२ करिता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानतून

भागविण्यात यावा. तसेच त्यापुढील खर्च या उद्दीष्टांतर्गत वर्ष २०२२-२३ या वर्षात मंजूर होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२१६१२३१४२७३०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Katikar Padmavati

Digitally signed by Katikar Padmavati
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food Civil Supplies And Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0a8ad7b53d0557c046089b7688f952dd3fa64ce328691d88242bbde043cba86c, serialNumber=ec2d6c76e02d91ee9f71efe012213ab98a56fdcc6bffb5ce4ef3fafa682eb741, cn=Katikar Padmavati
Date: 2021.12.16 12:33:02 +05'30'

**( प. न. काटीकर )**

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. प्रधान सचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक
२. महालेखापाल महाराष्ट्र -१/२, (लेखा व लेखापरिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर
३. अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई
४. सह सचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय यांचे स्वीय सहाय्यक
५. वित्तीय सल्लागार व उप सचिव कार्यालय, मुंबई.
६. प्रबंधक (प्रशासन), प्रबंधक (विधी) राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई
७. कक्ष अधिकारी (विनियम) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८. कक्ष अधिकारी, उद्योग, उजा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
९. निवडनस्ती /ग्रासं -४